**संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाभोवती संरक्षक भिंत बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी ०८.१९/ प्र.क्र.२४४/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०४ ऑक्टोंबर, २०१९.

**वाचा :-**

१. वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-२४ / वअ/लेखा/प्र.मं./प्र. क्र. २०/४४३/२०१९-२०२०, नागपूर, दिनांक :- ०७.०८.२०१९.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाकरीता संरक्षण भिंत बांधकामाच्या रु. ३,९८,५७,०००/- अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यासाठी प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

**शासन निर्णय :-**

संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाभोवती संरक्षक भिंत बांधकामाच्या रु. ७६.३४ लक्षच्या ४ अंदाजपत्रकास सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार खालील अटींच्या अधीन राहून सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

- ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे
- सदर कामास प्रशासकीय मान्यता देण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची खातरजमा करण्यात यावी.
- तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक :- २०१७/प्र.क. ११/ नियोजन-३, दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.
- प्रस्तावातील खरेदीशी संबंधीत बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दिनांक २४.०८.२०१७ चा शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.
- प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्रमांक :- इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क१, दिनांक १०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.
- विषयांकित कामाकरिता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. या दृष्टीने विशेष दक्षता घेवून काम करण्यात यावे.

२. सदरचा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौचारीक संदर्भ क्रमांक २१५ /इमा-३, दिनांक २१.०८.२०१९ ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक २०१९१००४१५१०४८०११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL DESHBHRATAR

Digitally signed by SWAPNIL DESHBHRATAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, postalCode=400037, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=ce420aedd83773a67f861ab4c751835b3c5119f8fc41f2f3aa39bd7749dc02e0, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL DESHBHRATAR
Date: 2019.10.04 15:11:54 +05'30'

**(स्वप्निल देशभ्रतार)**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
४. मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली.
५. महालोखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर
६. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
९. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
१०. कार्यासन फ-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२ (निवडनस्ती)

**महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी ०८.१९/ प्र.क्र.२४४/फ-१.**
**दिनांक ०४ /१०/२०१९ सोबतचे विवरणपत्र :-**

| अ.क्र. | बाब | किंमत (रुपयात) | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | विहार क्षेत्र | रावळपाडा क्षेत्र | ससुनवघर क्र. १११५ | ससुनवघर क्र. १११४ |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | बांधकाम | ५६,८६,५००.०० | ५६,९५,०००.०० | ५६,९५,०००.०० | ५६,९५,०००.०० |
| २ | संभावित दरवाढ १० टक्के | ५,६८,६५०.०० | ५,६९,५००.०० | ५,६९,५००.०० | ५,६९,५००.०० |
| | **एकूण (अ)** | ६२,५५,१५०.०० | ६२,६४,५००.०० | ६२,६४,५००.०० | ६२,६४,५००.०० |
| ३ | अकस्मिक शुल्क ( अ )चे ४ टक्के | २,५०,२०६.०० | २,५०,५८०.०० | २,५०,५८०.०० | २,५०,५८०.०० |
| | **एकूण (ब)** | ६५,०५,३५६.०० | ६५,१५,०८०.०० | ६५,१५,०८०.०० | ६५,१५,०८०.०० |
| ४ | सेंटेज शुल्क ( ब) चे ०.५ टक्के | ३,२५,२६७.८० | ३,२५,७५४.०० | ३,२५,७५४.०० | ३,२५,७५४.०० |
| ५ | जी.एस.टी. (ब) चे १२ टक्के | ७,८०,६४२.७२ | ७,८१,८०९.६० | ७,८१,८०९.६० | ७,८१,८०९.६० |
| | **एकूण** | **७६,११,२६६.५२** | **७६२२६४३.६०** | **७६,२२,६४३.६०** | **७६,२२,६४३.६०** |
| **एकूण** | **(विहार क्षेत्र+रावळपाडा क्षेत्र+ससुनवघर क्र. १११५ + ससुनवघर क्र. १११४)** | | | | **३०४७९१९७.३२** |
| | | | | **म्हणजेच रुपये** | **३०४.७९ लक्ष** |